<u>कोषागारातून रोखदेय अनुदान</u>

**केंद्र पुरस्कृत मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) योजनेतंर्गत सन २००९-१० या आर्थिक वर्षाच्या जिल्हा आराखडयासाठी मंजूर विकास निधीचा दुसरा हप्ता वितरीत करण्याबाबत.**

---

**वितरण आदेश क्रमांक ६/२०१०**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक - बीआरजीएफ२०१०/प्र.क्र.१०३/पंरा-६**
**मंत्रालय , मुंबई - ४०००३२.**
**दिनांक - १७ ऑगस्ट, २०१०.**

**वाचा:** शासन निर्णय क्रमांक बीआरजीएफ२००९/प्र.क्र.१३८/पंरा-६, दिनांक ५ नोव्हेंबर २००९.

**शासन निर्णय:-**

मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना राज्यातील १२ जिल्हयांमध्ये राबविण्यात येत असून, पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांनी सदर योजनेअंतर्गत सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठी मंजूर केलेल्या जिल्हा आराखडयातील कामावरील खर्च भागविण्याकरीता प्रथम हप्ता (वार्षिक तरतूदीच्या ९०%) रुपये २२८१९.०० लाख (अक्षरी रूपये दोनशे अठ्ठावीस कोटी एकोणीस लाख फक्त) एवढे अनुदान संदर्भाधिन शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले होते. केंद्र शासनाने सन २००९-१० आर्थिक वर्षासाठीच्या जिल्हा आराखडयांच्या अमलबजावणीकरीता अमरावती जिल्हयाला सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील रकाना ५ नुसार उर्वरित १०% अनुदान रुपये २४१.३० लाख (अक्षरी रूपये दोन कोटी एक्केचाळीस लाख तीस हजार फक्त) उपलब्ध करुन दिले आहेत.

२. योजनेच्या मार्गदर्शक तत्वानुसार सदर अनुदानांपैकी ५% निधी जिल्हा परिषद/पंचायत समिती/ग्रामपंचायत स्तरावर प्रकल्प व्यवस्थापन कक्षाच्या संबंधित खर्च भागविण्यासाठी व उर्वरीत ९५% विकास निधी उच्चाधिकार समिती मार्फत मंजूर जिल्हा आराखडयामध्ये प्रस्तावित केलेल्या प्रमाणात ग्रामीण व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या विकास कामांवर खर्च करणे आवश्यक आहे.

३. पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांनी मंजूर केलेला निधी सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील रकाना ८ नुसार या शासन निर्णयाद्वारे रुपये २४१.३० लाख (अक्षरी रुपये दोन कोटी एक्केचाळीस लाख तीस हजार फक्त) अमरावती जिल्हयास वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

या निधीबाबत संबंधित जिल्हयांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

४. जिल्हा आराखडयामध्ये प्रस्तावित केलेल्या प्रमाणात ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थाचा निधी हा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांचे अधिनस्त ठेवण्यात यावा. ते या निधीच्याबाबतीत नियंत्रक अधिकारी राहतील. उर्वरीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निधीच्या बाबतीत संबंधित जिल्हयांचे जिल्हाधिकारी हे नियंत्रक अधिकारी राहतील. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचा निधी संबधित जिल्हयांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना वितरीत करावा. हा निधी मागास क्षेत्र अनुदान निधी योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार व शासनाकडून मंजूर करण्यात आलेल्या आराखडयातील योजनांवर / कामांवर खर्च करण्याची खबरदारी उपरोक्त दोन्ही नियंत्रक अधिकाऱ्यांनी घ्यावी. या संबंधीची सर्वस्वी जबाबदारी नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी व जिल्हाधिकारी यांची राहील.

५. उपरोक्त निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, यांना प्राप्त झाल्यापासून कोणत्याही परिस्थितीत १५ दिवसाच्या आत संबधित अंमलबजावणी यंत्रणेस (ग्रामपंचायत/महानगरपालिका/नगरपरिषद) वितरीत करण्याविषयी पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांच्या स्पष्ट सूचना आहेत. त्या अनुषंगाने संबधित नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त मुदतीत अंमलबजावणी यंत्रणेस निधी वितरण करण्याची दक्षता घ्यावी.

६. नियंत्रक अधिका-यांनी झालेल्या/होणा-या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयाच्या नोंदीशी ताळमेळ घेवून प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयात नोंद झालेला खर्च यामध्ये तफावत राहणार नाही याबाबत दक्षता घ्यावी आणि खर्चाच्या ताळमेळाचा दर तिमाही अहवाल विहीत मुदतीत सादर करावा. याशिवाय या योजनेच्या मासिक खर्चाचा अहवाल दरमहा १० तारखेपूर्वी शासनास पाठवावा. तसेच सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांना सादर करावे व त्याची प्रत शासनास पाठवावी.

७. सदरहू खर्च "मागणी क्र.-एल-३-२५१५- इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १०२- सामूहिक विकास, केंद्र पुरस्कृत योजना, (०१) (०१), राष्ट्रीय सम विकास योजना/मागास भागासाठी

अनुदान निधी योजना, (२५१५०४९२) (योजनांतर्गत/दत्तमत), ३१-सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण (BEAMS) प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदी मधून भागवावा.

८. सदर निधी वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.अनौ.संक्र.५९६/अर्थसं.१७,दिनांक-१०/८/२०१० अन्वये दिलेल्या सहमतीने वितरीत करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००८१७१८५८०८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(र.दि.औटे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) महालेखापाल, (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई.
२) महालेखापाल, (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र २ नागपूर.
३) संचालक लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
४) विभागीय आयुक्त, अमरावती
५) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
६) जिल्हाधिकारी, अमरावती.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, अमरावती.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
९) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती.
१०) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा अमरावती.
११) जिल्हा नियोजन अधिकारी,अमरावती.
१२) जिल्हा प्रकल्प अधिकारी,जिल्हा नागरी विकास यंत्रणा, जिल्हाधिकारी यांचे कार्यालय. अमरावती.
१३) वित्त विभाग अर्थसंकल्प १७/व्यय-१५/अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई.
१४) नियोजन विभाग, का. १४१४, १४४४, मंत्रालय, मुंबई.
१५) कार्यासन वित्त-१/वित्त-७/योजना-७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती - कार्यासन पंरा-६, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

(शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बीआरजीएफ२०१०/प्र.क्र.१०३/पंरा-६ दि. १७ ऑगस्ट २०१० चे विवरण पत्र)

**मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) योजनेंतर्गत सन २००९-१० वर्षासाठीच्या जिल्हा आराखडयासाठी मंजुर दुसरा हप्ता अनुदान वितरण**
**(वितरण ओदश ६/२०१०)**

(रूपये लाखात)

| अ. क्र | जिल्हयाचे नांव | वार्षिक तरतूद | दि.५ नोव्हे.२००९ च्या शासन निर्णयान्वये वितरीत निधी (प्रथम हप्ता) | उर्वरीत मंजूर अनुदान (दुसरा हप्ता) | स्थानिक स्वराज्य संस्थांच्या स्तरावर प्रकल्प व्यस्थापनासाठी राखीव निधी ५% | जिल्हा आराखडयानुसार विकास कामांवर खर्च करावयासाठीचा निधी ९५% | या शासन निर्णयान्वये जिल्हानिहाय वितरीत करण्यात आलेला निधी १००% |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ (६+७) |
| १ | अमरावती | २४१३.०० | २१७१.७० | २४१.३० | १२.०० | २२९.३० | २४१.३० |

(र.दि.औटे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन